**सहायक कक्ष अधिकारी यांच्या कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठी सन २०२१ मध्ये घ्यावयाच्या विभागीय परीक्षेच्या प्रशिक्षण आणि परीक्षेसाठी अर्ज पाठविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः परीक्षा२१२१/प्र.क्र.५९/का.१७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २२ डिसेंबर, २०२१

वाचा :- १) महाराष्ट्र शासनाच्या दुय्यम मंत्रालयीन सेवा(कक्ष अधिकारी)विभागीय परीक्षा नियम, १९७७ दिनांक ६ जून, १९७७.

२) मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकारी (विभागीय परीक्षा आणि प्रशिक्षण) नियम, १९९१ दिनांक ५ डिसेंबर, १९९१.

३) शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २३१५/प्र.क्र. ८/कार्यासन-१७ दिनांक २७ मार्च, २०१५.

**शासन परिपत्रक:-**

मंत्रालयीन प्रशासकीय विभाग आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयातील सहायक कक्ष अधिकारी यांच्या कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठी सन २०२१ मध्ये घेण्यात येणाऱ्या परीक्षेच्या अनुषंगाने आयोजित करावयाच्या प्रशिक्षण आणि परीक्षेसाठी पुढीलप्रमाणे पात्र उमेदवारांचे विहित नमुन्यातील अर्ज या परिपत्रकान्वये मागविण्यात येत आहेत:-

महाराष्ट्र शासन दुय्यम मंत्रालयीन सेवा विभागीय परीक्षा नियम, १९७७ च्या नियम ३ मधील तरतूदीनुसार मंत्रालयीन प्रशासकीय विभाग तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे कार्यालय येथे कार्यरत असलेल्या ज्या कर्मचाऱ्यांची सहायक कक्ष अधिकारी पदावर **दिनांक ३१ ऑक्टोबर, २०२१** पर्यंत पाच वर्षांची अखंड सेवा पूर्ण होत आहे आणि ज्यांनी सहायक सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा उत्तीर्ण केलेली आहे असे नियमित सहायक कक्ष अधिकारी यांनी नियम- १६ , परिशिष्ट-ब प्रमाणे विहित नमुन्यात अर्ज सादर करावा.

२. उपरोक्तप्रमाणे पात्र सहायक कक्ष अधिकारी ज्यांनी यापूर्वी या विभागीय परीक्षा प्रशिक्षणाचा लाभ घेतला नसून ते प्रथमच या परीक्षेसाठी अर्ज करत आहेत केवळ अशाच उमेदवारांचे विहित नमुन्यातील अर्ज संबंधित प्रशासकीय विभागाच्या आस्थापना अधिकारी यांनी प्रमाणित करुन सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१७) **येथे दि.१५ जानेवारी, २०२२ पर्यंत** प्राप्त होतील अशा रितीने पाठवावेत. मंत्रालयीन इंट्रानेटवरील "आवेदन पत्र" या शिर्षाखाली अर्जांचे विहित नमूने उपलब्ध करुन देण्यात आले आहेत.

३. जे सहायक कक्ष अधिकारी यापूर्वी झालेल्या विभागीय परीक्षेत अनुत्तीर्ण झाले आहेत किंवा परीक्षेला अनुपस्थित राहिले आहेत त्यांचे सन २०२१ मध्ये होणाऱ्या परीक्षेला बसण्यासाठीचे अर्ज स्वतंत्र परिपत्रकाद्वारे यथावकाश मागविण्यात येतील तेव्हा ते पाठविण्यात यावेत.

४. सर्व प्रशासकीय विभागाच्या आस्थापना अधिकारी यांनी कृपया सदर परिपत्रक सर्व संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांच्या (प्रतिनियुक्तीवर/रजेवर असलेल्या सहायक कक्ष अधिकारी) त्वरित निदर्शनास आणावे व त्यांची स्वाक्षरी घेऊन ते कागदपत्र आपल्या अभिलेखात जतन करुन ठेवावेत. विहित नमुन्यातील अर्जात उमेदवाराने आपले संपूर्ण नाव, नियमित नियुक्ती दिनांक, विभागाचे नाव इत्यादी तपशील अचूक नमूद करावा. वरीलप्रमाणे पात्र उमेदवारांचे अर्ज सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-१७ येथे **दिनांक १५ जानेवारी, २०२२** पर्यंत पोच होतील याची दक्षता संबंधित विभागाच्या आस्थापना अधिकारी यांनी तसेच संबंधित उमेदवारांनी घ्यावी.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२११२२२१६२७५४५१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA PANDURANG WAGH

Digitally signed by RAJENDRA PANDURANG WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9e4468a63fe9f9f2a565a0790f46e3c14a3715b2370430433845720a9c4c8107, pseudonym=62A7D25FA2D36D8EB402C245D109AC23C63DFAAA, serialNumber=7ADB1868A49B8719E27D3453044671A8CEDDBD04AF26DD2089ED03E6B1BD92BD, cn=RAJENDRA PANDURANG WAGH
Date: 2021.12.22 16:29:00 +05'30'

**(राजेंद्र वाघ)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, ( पत्राने )
२. आस्थापना अधिकारी, सर्व मंत्रालयीन विभाग,
३. सामान्य प्रशासन विभाग/का.१४-ब,
४. निवड नस्ती.